# महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. सुप्रमा-२००९/६६१/(२१८/०९)/मध्यम प्रकल्प
मंत्रालय, मुंबई
दिनांक :- २६/८/२००९

संदर्भ : १) शासन पत्र क्र. अे.आर.जे १०८७/१३१४/(१९१/८७) जसंअ दि.५.१२.९५
२) शासन पत्र क्र. अर्जुना/१००१/६७३/(१६५-२००१) म.प्र दि.५.५.२००१
३) शासन पत्र क्र. अर्जुना/१००१/८०९/(१५७/२००३) म.प्र दि.३.११.२००४

**प्रस्तावना :-**

रत्नागिरी जिल्हयातील राजापुर तालुक्यातील अर्जुना मध्यम प्रकल्पास शासन निर्णय क्र. अे.आार.जे १०८७/१३१४/(१९१/८७) जसंअ दिनांक ५.१२.९५ अन्वये (दरसूची १९९३-९४ वर आधारित) रुपये ६१८८.३३ लक्ष (रुपये एकसष्ट कोटी अठ्ठयांऐशी लक्ष तेहतीस हजार फक्त) एवढया अंदाजित खर्चास मूळ प्रशासकिय मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर सर्वसाधारण भाववाढीमुळे, सामुग्रीच्या वहन अंतरातील बदलामुळे व अनुषंगिक खर्चातील वाढीमुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ झाली व त्यामुळे प्रकल्पास रुपये १४५४५.५५ लक्ष (रुपये एकशे पंचेचाळीस कोटी पंचेचाळीस लक्ष पंचावन्न हजार फक्त) एढया रकमेस शासन पत्र क्र. अर्जुना १००१/६७३/(१६५-२००१) म.प्र दिनांक ५.५.२००१ अन्वये (दरसूची १९९९-२००० नुसार) प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती. दरम्यानचे काळात दरसूचीतील वाढ, संकल्पचित्रातील बदलामुळे झालेली वाढ, अनुषंगिक खर्चातील वाढ यामुळे प्रकल्पाच्या किंमतीमध्ये वाढ होऊन प्रकल्पास रुपये २६,१३६.०६ लक्ष (रुपये दोनशे एकसष्ट कोटी छत्तीस लक्ष सहा हजार फक्त) एवढया रकमेस शासन पत्र क्र. अर्जुना १००१/८०९/(१५७/२००३) म.प्र दिनांक ३.११.२००४ (दरसूची २००३-०४ नुसार) द्वितीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

आता दरसूचीतील वाढीमुळे प्रकल्पाचे किंमतीत झालेली वाढ, भूसंपादनाचे किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदल (द्वाररहित सांडवा लांबीत वाढ, धरणाचे उंचीत वाढ, माती धरणाचे लांबीत वाढ इ.) व अनुषंगिक खर्चातील वाढ यामुळे प्रकल्पाचे किंमतीत वाढ झाली आहे. यासाठी महामंडळाने सादर केलेल्या तृतीय सुधारित प्रशासकिय प्रस्तावास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाचे विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे रत्नागिरी जिल्हयातील राजापुर तालुक्यातील अर्जुना मध्यम प्रकल्पाच्या कामासाठी सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित रु. ४७६४९.१३९ लक्ष (रुपये चारशे श्याहत्तर कोटी एकोणपन्नास लक्ष तेरा हजार फक्त) एवढया रकमेस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये ४३८०८.९६७ लक्ष (रुपये चारशे अडोतीस कोटी आठ लक्ष शहान्नव हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रुपये ३८४०.१७२ लक्ष (रुपये अडोतीस कोटी चाळीस लक्ष सतरा हजार फक्त) अनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र-२ मध्ये सुधारित सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र. १४/२००९ वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे रत्नागिरी जिल्हयातील ५७०४ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५२ आहे.

२. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५/४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च-८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) (०३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ७६३) अर्जुना मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रकल्पाची सुधारित किंमत पुढील येणा-या अधिवेशनात विधानमंडळाच्या निदर्शनास लाक्षणिक पुरक मागणीद्वारे आणण्यांत येईल.

४. हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र.संकीर्ण १०९९/(१२६/९९) मोप्र (प्र) दिनांक १८.५.९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार व आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २००९०८२६१५१२३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

**( सु.बा.सलाम)**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, कोकण पाटबंधारे मंडळ, कुवारबांव-रत्नागिरी (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, पाटबंधारे प्रकल्प बांधकाम विभाग, रत्नागिरी
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (द.व.प्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अवर सचिव (म.प्र.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप अभियंता (म.प्र.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मध्यम प्रकल्प, कार्यासन संग्रहार्थ
निवड धारिका

**तक्ता क्रमांक १**

**अर्जुना मध्यम प्रकल्प ता. राजापुर जि.रत्नागिरी**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६६१/(२१८/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २६.८.२००९ चे सहपत्र**

**तृतीय सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १) | 'अे'प्राथमिक सर्वेक्षण | २९३.६९९ |
| २) | 'बी' भूसंपादन | ६१८७.५३२ |
| ३) | 'सी' कामे | २७८२५.००० |
| ४) | 'डी' विमोचक | १९६१.८४९ |
| ५) | 'ई' फॉल्स | ३६.३४२ |
| ६) | 'एफ' आर.एच.टी.कामे | ११८४.७७६ |
| ७) | 'जी' ब्रिजेस | ४२७.१०९ |
| ८) | 'एच' एस्केप | १४.४६३ |
| ९) | 'के' इमारती | १११.७६३ |
| १०) | 'एल' मातीकाम | ३५३०.३९० |
| ११) | 'एम' वृक्षारोपण | १५.३२५ |
| १२) | 'आे' संकिर्ण | ५१.२११ |
| १३) | 'पी' देखभाल व दुरुस्ती | १७३.७४८ |
| १४) | 'क्यू' हत्यारे व संयत्रे | १४.३२५ |
| १५) | 'आर' दळणवळण | १६०२.११९ |
| १६) | वितरीका भाग-३ | २८५.२०० |
| १७) | पाटचाऱ्या | ९४.११६ |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | ४३८०८.९६७ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | ३८४०.१७२ |
| | **एकूण** | **४७६४९.१३९** |

**तक्ता क्रमांक २**

**अर्जुना मध्यम प्रकल्प ता. राजापुर जि.रत्नागिरी**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/६६१/(२१८/०९)/मध्यम प्रकल्प दिनांक २६.८.२००९ चे सहपत्र**

**तृतीय सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे | <br>३६९०४.४९२<br>६९०४.४७५ |
| | **एकूण (अ)** | **४३८०८.९६७** |
| (ब) | **अधिक**<br>१) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून)<br>२) हत्यारे व अवजारे ३.५ टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ३.५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>२६३१.५२१<br>७९९.८२४<br>---<br>--- |
| | **एकूण (ब)** | **३४३१.३४५** |
| | **एकूण (अ+ब)** | **४७२४०.३१२** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>०.२४४<br><br>२.८००<br>१.५६८ |
| | **एकूण वजाती** | **(-) ४.६१२** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **४७२३५.७००** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्केचे कामावरील खर्च, बी जमीन वगळून<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>२४.०६८<br>३७६.२१४<br>१३.१५७ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **४१३.४३९** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **४७६४९.१३९** |